सिनेमाटोग्राफ ॲक्ट , १९५२ च्या
तरतुदीची कडक अंमलबजावणी होण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृहविभाग.

परिपत्रक क्रमांक - बीसीआर ५३१३/१७१/वि.शा.५,
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक १५ मे ~~एप्रिल~~ १९९६.

प रि प त्र क

सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ च्या तरतुदीनुसार चित्रपटांना प्रमाणपत्र देण्यासंदर्भात केंद्र शासनाने सेंट्रल बोर्ड ऑफ फिल्म सर्टिफिकेशन ही संविधीक संस्था निर्माण केलेली असून सार्वजनिक प्रदर्शनासाठी चित्रपटांना प्रमाणपत्र देणे हे सदर संस्थेचे कार्य आहे. सर्वसाधारणपणे सेन्सॉर बोर्ड हे वेगवेगळ्या चित्रपट प्रदर्शनासाठी वेगवेगळ्या स्वरुपाची प्रमाणपत्रे देत असते आणि त्याबाबतची थोडक्यात माहिती खालीलप्रमाणे आहे :-

१] अनिर्बंध सार्वजनिक प्रदर्शनासाठी " यु" प्रमाणपत्र .
२] केवळ प्रौढांकरिता "अ " प्रमाणपत्र .
३] १२ वर्षाखालील मुलांना त्यांच्या पालकाच्या मार्गदर्शनाखाली पहाण्याच्या अटीवर अनिर्बंध सार्वजनिक प्रदर्शनासाठी " युए " प्रमाणपत्र.
४] विशिष्ट प्रवर्गाच्या प्रेक्षकांसाठी सार्वजनिक प्रदर्शनासाठी "एस " प्रमाणपत्र..

२. सार्वजनिक प्रदर्शनासाठी उपरोक्त प्रमाणपत्रे देण्यात येत असून त्याप्रमाणे चित्रपट प्रदर्शनाची कारवाई व्हावी अशी केंद्र शासनाची व सेन्सॉर बोर्डाची अपेक्षा असली तरी प्रत्यक्षात मात्र काही प्रसंगी सार्वजनिक प्रदर्शनासाठीच्या चित्रपटाच्या प्रदर्शनाच्या वेळी उपरोक्त सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ च्या तरतुदीचे उल्लंघन होण्याचे प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात. विसंगतीचे सर्वसाधारण प्रकार हे खालील-प्रमाणे असल्याचेही आढळून आले आहे :-

[अ] प्रमाणित केलेल्या चित्रपटामध्ये बदल म्हणजेच सेन्सॉर बोर्डाने जो भाग कापलेला आहे किंवा जो भाग प्रमाणपत्र देताना प्रदर्शित करण्यात आलेला नाही तो भाग प्रमाणित चित्रपटाबरोबर दाखविणे. त्याशिवाय प्रमाणित केलेल्या चित्रपटाबरोबर ब्ल्यू फिल्मचे तुकडे दाखविणे .

ब] प्रमाणपत्रासाठी दाखविण्यात न आलेली फिल्म प्रदर्शित करणे.

क] सिनेमाटोग्राफ ॲक्टच्या खंड -६ नुसार शासनाने अप्रमाणित [डीसर्टिफाईड्] केलेली फिल्म प्रदर्शित करणे.

ड] "अ" प्रमाणपत्र देण्यात आलेली फिल्म प्रौढ नसलेल्यांना दाखविणे.

इ] "एस" सर्टिफिकेट असलेली फिल्म ज्या प्रवर्गासाठी नाही त्या विशिष्ट प्रवर्गाला दाखविणे.

ई] चित्रपटगृहात सार्वजनिक प्रदर्शनासाठी असलेल्या चित्रपटाबाबतचे प्रमाणपत्र प्रदर्शित न करणे.

ए] फिल्मला देण्यात आलेल्या प्रमाणपत्रापेक्षा वेगळे प्रमाणपत्र असल्याची जाहिरात करणे.

वर दर्शविलेल्या सर्व बाबी या सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ च्या तरतुदीचे उल्लंघन करणाऱ्या बाबी आहेत, हे स्पष्ट आहे. मात्र राज्य शासनाची अंमलबजावणी यंत्रणाच या विरुध्द परिणामकारक उपाययोजना करु शकते असे केंद्र शासनाचे मत असून त्यानुसार कोणती परिणामकारक कारवाई केली जाऊ शकते याचीही रुपरेषा केंद्र शासनाने सूचित केली असून ती थोडक्यात खालीलप्रमाणे आहे :-

१] सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ च्या प्रकरण-२ मधील गुन्हे हे दखलपात्र आणि जामिनयुक्त असे गुन्हे आहेत. उपरोक्त कायद्याच्या खंड-७ मध्ये या कायद्याच्या तरतुदीचे उल्लंघन करणाऱ्यांविरुध्द काय शिक्षा केली जाऊ शकते याचा उल्लेख आहे. तर उपरोक्त कायद्याच्या खंड-७[अ] मध्ये तपासणी आणि जप्तीचे अधिकार आहेत. त्यामध्ये असा स्पष्ट उल्लेख करण्यात आलेला आहे की, कोणताही पोलीस अधिकारी अशा जागेत प्रवेश करु शकतो आणि उपरोक्त कायद्याच्या तरतुदीचे उल्लंघन होत असल्याचे आढळल्यास त्या ठिकाणची झडती घेऊन जप्त करु शकतो. त्यामुळे अंमलबजावणी यंत्रणेने वर दर्शविल्याप्रमाणे चित्रपट प्रदर्शित करण्याबाबतच्या बाबी आणि उपरोक्त कायद्याच्या तरतुदीचे उल्लंघना-बाबत आवश्यक ती कारवाई करणे अभिप्रेत आहे.

२] राज्य शासनाने चित्रपटगृह विषयक बाबी विनियमित करण्याच्या दृष्टीने मुंबई सिनेमा अधिनियम, १९५३ आणि महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम, १९६६ हे आदेश जारीत केले आहेत. या आदेशाच्या तरतुदीनुसार परवान्याच्या अटी व शर्ती किंवा उपरोक्त अधिनियम व नियम याचे उल्लंघन करणाऱ्या चित्रपटगृहाचा परवाना निलंबित करणे

किंवा रद्द करण्याचे अधिकार परवाना प्राधिकाऱ्यांना आहेत. त्यामुळे परवाना रद्द करणे किंवा निलंबित करणे अशा स्वरूपाची कडक कारवाई ~~~x चित्रपटगृहाविरुद्ध करण्यात यावी असे केंद्र शासनाला अभिप्रेत आहे.

३] सिनेमाटोग्राफ [सर्टिफिकेशन] रूल्स, १९८३ च्या कलम –३०[३] नुसार सेन्सॉरने दिलेल्या प्रमाणपत्राची [ज्यामध्ये पार्ट–१ आणि पार्ट–२च्या दोन्हींचा समावेश आहे] डुप्लीकेट प्रत चित्रपटगृहात ठळकपणे प्रदर्शित करणे बंधनकारक आहे. त्याप्रमाणे उपरोक्त नियमाच्या नियम–३८ नुसार चित्रपटाच्या जाहिरातीत केवळ ज्या शीर्षकाला मान्यता दिली आहे तेच प्रमाणित शीर्षक देणे आवश्यक आहे.

४] फिल्म पोस्टरबाबत सातत्याने तक्रारी प्राप्त होत असतात. सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ मध्ये फिल्म पोस्टर बाबत तरतूद करण्यात आली नसली तरी भारतीय दंड विधानाच्या कलम –२९२ नुसार अश्लील, बिभत्स अशा पोस्टर विरुद्ध स्थानिक पोलीस अधिकारी कारवाई करू शकतात. पण दुर्दैवाने पोलीस अधिकाऱ्यांकडून फिल्म पोस्टरच्या संबंधात वर दर्शविल्याप्रमाणे कारवाई होत नाही व परिणामी अश्लील आणि बिभत्स स्वरूपाचे पोस्टर लावले जातात. प्रमाणित केलेल्या चित्रपटातील काही दृश्ये पोस्टरमध्ये दाखविली जाण्याची शक्यता आहे. परंतु चित्रपटातील दृश्य हे एक किंवा दोन अशा फ्रेमच्या स्वरूपात असतात आणि अशी फ्रेम जर फ्रीज केली किंवा ती मोठ्या प्रमाणात विस्तारीत केली तर लहान मुलांसहीत सर्वांचे ते दृश्य लक्ष वेधून घेते आणि त्यामुळेच अश्लील आणि बिभत्स अशा स्वरूपाच्या पोस्टरविरुद्ध स्थानिक अधिकाऱ्यांनी योग्य व कडक कारवाई करणे आवश्यक आहे.

३. सिनेमाटोग्राफ ॲक्ट, १९५२ किंवा केबल टेलीव्हीजन नेटवर्क रेग्युलेशन ॲक्ट, १९९५ च्या तरतुदी जर त्या आदेशांची योग्य आणि कडक स्वरूपात अंमलबजावणी केली तरच परिणामकारक ठरू शकतील. केंद्र शासनाकडे समाजाच्या वेगवेगळ्या घटकांकडून अशा प्रवृत्तींच्या विरुद्ध वारंवार तक्रारी प्राप्त होतात आणि अशा तक्रारींच्या संदर्भात प्रदर्शक किंवा वितरक आणि समाजकंटकांकडून या कायद्याचे उल्लंघन करून जनतेला वेठीस धरण्याचे जे प्रकार केले जातात त्या विरुद्ध कडक कारवाई करण्याची आवश्यकता आहे. त्यामुळे अशा समाजकंटकांविरुद्ध कायद्याच्या तरतुदींची कठोर अंमलबजावणी केल्याशिवाय या प्रकाराला आळा बसणार नाही. दुर्दैवाने वर दर्शविल्याप्रमाणे अशा बाबींना आळा घालण्यासाठी पूर्ण अधिकार स्थानिक अधिकाऱ्यांना दिले असून देखील कायद्याच्या अंमलबजावणी यंत्रणेकडून या संदर्भात कठोर कारवाई केली जात नाही असे

दृष्टोत्पत्तीस आले आहे. त्यामुळे यापुढे वर दर्शविलेल्या बाबी संदर्भात अशा घटना दृष्टोत्पत्तीस आल्यास त्वरित आणि कडक कारवाई केली जाईल याची सर्व स्थानिक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अ. ना. भोसले ]

कार्यासन अधिकारी, गृहविभाग [विशेष], महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, ~~महाराष्ट्र राज्य, मुंबई~~, व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व पोलीस आयुक्त.

सर्व जिल्हादंडाधिकारी,

सर्व पोलीस अधिक्षक.